**<u>महाराष्ट्र राज्य लॉटरी</u>**
**महाराष्ट्र गुढीपाडवा भव्यतम सोडतीची बक्षिसरचना व कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०२२/ प्र.क्र. १६ /लॉटरी २**
नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २८ फेब्रुवारी, २०२२.

<u>वाचा :</u> उपसंचालक(वि.वले.)यांचे पत्र क्र.उपसं(वि.व ले.)/मरालॉ/योजना/७७८/२०२२,दि. २५/०२/२०२२.

**<u>शासन निर्णय</u> :**

**" महाराष्ट्र गुढीपाडवा भव्यतम सोडत"** ही सोडत केंद्र शासनाचे लॉटरी (विनियमन) अधिनियम-१९९८ व लॉटरी (विनियमन) नियम-२०१० प्रमाणे कार्यान्वित करण्यात येत आहे. ही भव्यतम लॉटरी सोडत दि.१२/०४/२०२२ रोजी सायंकाळी ४.०० वाजता काढण्यात येईल.

२. या सोडतीच्या तिकिटाचे दर्शनी मूल्य **रु. २००/-** असून प्रत्येक मालिकेत ३०,००० तिकीटे असलेल्या **५** मालिकांत एकूण १ लाख ५०हजार तिकीटे मुद्रीत करण्यात येतील. या सोडतीतील प्रत्येक मालिकेमध्ये तिकीटांचे क्रमांक १०००० ते ३९९९९ या प्रमाणे असतील. या सोडतीमध्ये **<u>पहिले बक्षिस रू. ५१ लाखाचे</u>** ठेवण्यात येत आहे.

३. " महाराष्ट्र गुढीपाडवा भव्यतम सोडत " या सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि.व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, वाय, ए-१, शॉप कम- गोडाऊन, एपीएमसी मार्केट, सेक्टर-१९बी, वाशी, नवी मुंबई. या कार्यालयातून सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील. या सोडतीची तिकीट विक्री फक्त महाराष्ट्र राज्यातच करण्यात येईल. तसे लॉटरी तिकीटांवर छापण्यात येईल.

४. या सोडतीची तिकीट विक्री करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना १०० तिकीटांचे एका पुस्तकावरील (M.R.P. Rs. २००/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर खरेदी करण्यात आलेल्या या सोडतीच्या एकूण लॉटरी तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर [वस्तु व सेवा करासह (GST)] पुढील प्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| तिकीटांची संख्या | अनुज्ञेय घाऊक सूट (GST सहित) |
|---|---|
| ५०० ते २५००० तिकीटे | १८% |
| २५००१ ते ५०००० तिकीटे | २०% |
| ५०००१ ते १००००० तिकीटे | २४% |
| १००००१ ते १२५००० तिकीटे | २५% |
| १२५००१ ते १५०००० तिकीटे | २६% |

जो घाऊक विक्रेता या सोडतीच्या तिकीटांची खरेदी करतील त्या विक्रत्यास प्रत्यक्ष खरेदी करील त्या एकूण तिकीटांच्या संख्येवर (Actual number of total tickets purchased) २% (GST वगळून) विशेष सूट जाहिरात व प्रसिध्दीकरीता देय राहील. याबाबतच्या अटी व शर्ती शासन निर्णय, वि. वि. क्र. मरालॉ २०१२/प्र.क्र.४७/ लॉटरी -२, दिनांक ०८/०५/२०१२ नुसार लागू राहतील.

**५.** " महाराष्ट्र गुढीपाडवा भव्यतम सोडत" या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उपसंचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवी मुंबई-४०० ७०५ यांचे कार्यालयाकडून स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. या सोडतीची तिकीट छपाई मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स प्रा. लि., फरीदाबाद यांचेकडून करून घेण्यात येईल. या तिकीटाचे आकारमान २४ x १४ cms असून यासाठी कागदाचा दर्जा १३० GSM Indian Art Paper वापरण्यात येऊन त्याचा छपाई दर रू**. ३१२/-** प्रती चौ. से.मी. प्रती लाख असा राहील.

**६.** घाऊक अभिकर्त्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक विक्रेत्याने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, वाय, ए-१, शॉप कम- गोडाऊन, एपीएमसी मार्केट, सेक्टर-१९बी, वाशी, नवी मुंबई-४०० ७०५ या कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

**७.** " महाराष्ट्र **गुढीपाडवा** भव्यतम " सोडतीची बक्षिसंरचना -

मालिका : ५ (GP-०१ ते GP-०५ ) प्रत्येक मालिकेत ३०००० तिकिटे

तिकीटांचे क्रमांक १०००० ते ३९९९९ एकूण तिकिटे १ लाख ५० हजार

सोडत दिनांक- १२/०४/२०२२ तिकीटांची किंमत रू.२००/-(GST सहीत )

सोडतीची वेळ : सायं. ४.०० वाजता.

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम रूपये | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम रुपये |
|---|---|---|---|---|
| पहिले (सामायिक) बक्षिस (पूर्ण क्रमांक) | ५१,००,००० | | १ | ५१,००,००० |
| प्रोत्साहनपर बक्षिस (पूर्ण क्रमांक) (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ४ मालिकांसाठी ) | २,००,००० | | ४ | ८,००,००० |
| दुसरे बक्षिस ( पूर्ण क्रमांक) (२ स्वतंत्र क्रमांक ) | ५,००,००० | | २ | १०,००,००० |
| तिसरे बक्षिस ( शेवटचे ४ अंक ) (१ क्रमांक ) (सर्व मालिकांसाठी ) | १०,००० | ३ | १५ | १,५०,००० |
| चौथे बक्षिस ( शेवटचे ४ अंक ) (१ क्रमांक ) (प्रत्येक मालिकेसाठी) | ५,००० | ३ | १५ | ७५,००० |
| पाचवे बक्षिस ( शेवटचे ४ अंक ) (१ क्रमांक) (सर्व मालिकांसाठी) | २,००० | ३ | १५ | ३०,००० |
| सहावे बक्षिस ( शेवटचे ४ अंक ) ( १० क्रमांक ) (सर्व मालिकांसाठी ) | १,००० | -- | १५० | १,५०,००० |
| सातवे बक्षिस ( शेवटचे ४ अंक ) ( १० क्रमांक ) (सर्व मालिकांसाठी ) | ५०० | -- | १५० | ७५,००० |
| आठवे बक्षिस ( शेवटचे ४ अंक ) (कोणतेही ५५० क्रमांक सर्व मालिकांसाठी ) (Random पध्दतीने) | ३०० | -- | ८२५० | २४,७५,००० |
| | | | **८६०२** | **९८,५५,०००** |

घाऊक विक्रेत्याने ज्या किरकोळ विक्रेत्यास तिकीटे विकली असतील त्या किरकोळ विक्रेत्यांची यादी घाऊक विक्रेत्याने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या, वाशी, नवीमुंबई या कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

८. सोडतीची कार्यपध्दती :-

**"महाराष्ट्र गुढीपाडवा भव्यतम"** या सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा पध्दतीने ६ ड्रम्स ठेवले जातील. प्रत्येक मालिकेमध्ये १०००० ते ३९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकांचे अद्याक्षरे/क्रमांक असतील. दुसऱ्या ड्रम मध्ये १ ते ३ अंकाच्या चकत्या असतील व उर्वरित ४ ड्रम मध्ये ० ते ९ अंकाच्या प्रत्येकी एक चकती याप्रमाणे दहा चकत्या टाकण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील.

(१) तिसरे बक्षिस रू. १०,०००/- तिसऱ्या रु. १०,००० च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाचा एक क्रमांक स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येईल व तो क्रमांक सर्व मालिकांसाठी रू. १०,०००/- च्या तिसऱ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(२) चौथे बक्षिस रू. ५,०००/- चौथ्या रु. ५,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाचा एक क्रमांक स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येईल व तो क्रमांक सर्व मालिकांसाठी रू. ५,०००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(३) पाचवे बक्षिस रू. २,०००/- पाचव्या रु. २,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाचा एक क्रमांक स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येईल व तो क्रमांक सर्व मालिकांसाठी रू. २,०००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(४) सहावे बक्षिस रू. १,०००/- सहाव्या रु. १,०००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाचा एक क्रमांक, या प्रमाणे १० क्रमांक स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. ज्या तिकीटामध्ये असा क्रमांक आला असेल, अशी सर्व तिकीटे सर्व मालिकेतील रू. १,०००/- च्या सहाव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(५) सातवे बक्षिस रू. ५००/- सातव्या रु. ५००/- च्या बक्षिसासाठी शेवटच्या ४ ड्रम मधून ४ अंकाचा एक क्रमांक, या प्रमाणे १० क्रमांक स्वतंत्ररित्या काढण्यात येईल. ज्या तिकीटामध्ये असा क्रमांक आला असेल, अशी सर्व तिकीटे सर्व मालिकेतील रू. ५००/- च्या सातव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(६) आठवे बक्षिस रू. ३००/- आठव्या रु. ३००/- च्या बक्षिसासाठी संगणकावर शेवटच्या ४ अंकावर ५५० स्वतंत्र भाग्यवान क्रमांक रॅन्डम पध्दतीने काढण्यात येतील व ते क्रमांक सर्व मालिकांसाठी रू.३००/- च्या आठव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

(७) **पहिल्या क्रमाकांचे (सामायिक) रू. ५१,००,०००/- चे बक्षिस काढण्याची कार्यपध्दती** :-

**" महाराष्ट्र गुढीपाडवा भव्यतम "** या भव्यतम सोडतीमध्ये पाच मालिकांत मिळून रूपये **५१** लाखाचे पहिले (सामायिक) बक्षीस ठेवण्यात आले आहे. प्रथमत: पाच मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची आद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक

चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रम मध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी (पाऊच ) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ८ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने पूर्ण क्रमांकाचा एक भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

(८) **प्रोत्साहनपर बक्षिस रु. २,००,०००/-ची ४ बक्षिसे काढण्याची कार्यपध्दती :-**

या प्रोत्साहनपर बक्षिसासाठी पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरीत ४ मालिकांकरिता पहिल्या बक्षिसासाठी निश्चित करण्यात आलेल्या भाग्यवान क्रमांकास रू. २ लाखाचे प्रोत्साहनपर बक्षिस देण्यात येईल.

(९) **दुसऱ्या क्रमाकांचे रू. ५,००,०००/- चे बक्षिस काढण्याची कार्यपध्दती :-**

**" महाराष्ट्र गुढीपाडवा भव्यतम "** या भव्यतम सोडतीमध्ये **५ लाखाची २ बक्षिसे** दुसरे बक्षीस पुनश्चः पाच मालिकांमधून ठेवण्यात आले असून त्यासाठी प्रत्येक मालिकेची आद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लॅस्टिक/रबरी आवरणात घालून पंचमंडळाच्या समोर स्वतंत्र ड्रम मध्ये ठेवली जाईल. अध्यक्षांनी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाऊन व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येईल. ड्रममधून एकच पिशवी (पाऊच ) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंचमंडळाला दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद ८ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने पूर्ण क्रमांकाचा एक भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

**९.** या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र. जी -२, २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, १०३ राज्य लॉटरी, (००) (०१) प्रमुख लॉटरी,लॉटरी संचालनालय **(** २०७५०४७२**)** , १६ - प्रकाशने तसेच बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च हा मागणी क्र. जी -२, २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा १०३ राज्य लॉटरी (००) (०१) प्रमुख लॉटरी, लॉटरी संचालनालय **(**२०७५०४७२**)** ०५ -बक्षिसे या लेखाशिर्षामधील सन २०२१ -२०२२ मधील उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

**१०.** पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**११.** या सोडतीमध्ये कोणत्याही मालिकेमध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

**१२.** या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटावर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

**१३.** महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या या सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक/ एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

**१४.** वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

**१५.** सदरच्या सोडती कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.वले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी वाय, ए-१, शॉप गोडाऊन, एपीएमसी मार्केट, सेक्टर-१९बी, वाशी, नवी मुंबई-४०० ७०५ या कार्यालयाकडून करण्यात येईल व याबाबतची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहील.

**१६.** भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाचे Notification No.**४/२०१७-** Central Tax (Rates) दिनांक २८/०६/२०१७ मध्ये पुढील प्रमाणे तरतुद आहे.

| Sr. No. | Tariff item, sub-heading, heading or chapter | Description of supply of Goods | Supplier of goods | Recipient of supply |
|---|---|---|---|---|
| ५. | -- | Supply of lottery | State Government , Union Territory or any local authority | Lottery distributor or selling agent. *Explanation*.- For the purposes of this entry. lottery distributor or selling agent has the same meaning as assigned to it in clause (c) of Rule २ of the Lotteries (Regulation) Rules, २०१०, made under the provisions of sub-section I of section II of the lotteries (Regulations) Act, १९९८ (१७ of १९९८). |

केंद्र शासनाचे लॉटरी (विनियमन) नियम २०१० च्या नियम २ (c) मध्ये " distributor or selling agent" means an individual or a firm or a body corporate or other legal entity under law so appointed by the Organizing State through an agreement to market and sell lotteries on behalf of the Organizing State" असे नमूद आहे. तथापि, सदर तरतुदींनुसार महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या पारंपारिक लॉटरी सोडतींच्या तिकीट विक्रीसाठी शासनाने करार करून कोणीही अधिकृत विक्रेता नियुक्त केलेला नाही. त्यामुळे वरील नमूद नोटीफिकेशन मधील तरतुदींनुसार अधिकृत वितरक / विक्रेता वस्तु व सेवा कर भरणा करण्यासाठी आस्तित्वात नाही. अशा परिस्थितीत वस्तु व सेवा कर वसूल करून भरण्यासंदर्भात आयुक्त, वस्तु व सेवा कर कार्यालयाने पुढील प्रमाणे स्पष्टीकरण दिलेले आहे.

" If State Government supplies these lottery Tickets directly to any person, who is not legally appointed/authorized as lottery distributor or selling agent as described in clause (c) of Rule २ of the Lotteries (Regulation) Rules, २०१०,- Tax shall be collected and shall be paid by State Government only, as aforesaid."

तरी वरील स्पष्टीकरणानुसार महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या या प्रस्तावित सोडतींवरील लॉटरी तिकीटांच्या विक्रीवर तिकीट विक्रेत्यांकडून केंद्र शासनाच्या अधिसूचनेनुसार विहित केलेल्या दराने वस्तु व सेवा कर वसूल करून विहित पध्दतीने शासनाकडे भरण्याची कार्यवाही उपसंचालक (वित्त व लेखा)**,**महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय**,** वाशी**,** नवीमुंबई यांनी करावी व याबाबतची संपूर्ण जबाबदारी त्यांची राहिल.

१७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०३१७१२३८१९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHEELA KIRAN YADAV

Digitally signed by SHEELA KIRAN YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4c047de2d0631d7cdf6621cf125ce18774fca2cfed8bf4fb63b4f55cbd9731e4, pseudonym=235A8741EAE9111E4F1D4B67BD4AF6A80F61D9D1, serialNumber=832D784DB71C7629E92D57075BC10102D5F8C2CEA1675D3A4AB34FC4E47737AA, cn=SHEELA KIRAN YADAV
Date: 2022.03.03 17:15:29 +05'30'

**( शीला यादव )**
कार्यासन अधिकारी तथा
राज्य लॉटरी अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव. मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (वित्त), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, (गृह ), गृह विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (व्यय ), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. आयुक्त, राज्य लॉटरी यांचे स्वीय सहाय्यक. मुंबई
८. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा ), मुंबई/नागपूर.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
११. उप सचिव (राज्य लॉटरी), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई .
१२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४. उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाय,ए-१,शॉप गोडाऊन, एपीएमसी मार्केट, सेक्टर-९, गेट नं. १, वाशी, नवी मुंबई.
१५. कक्ष अधिकारी, प्रशा-४, वित्त, मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती, लॉटरी -२.